**ग्रुप ग्रामपंचायत विरसई, ता. दापोली, जि.रत्नागिरी येथील गोठण तलावास राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत निधी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०२२/प्र.क्र. ९०/आस्थापना (अ)**
नवीन प्रशासन भवन,१५ वा मजला, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२२

वाचा :-

१) पर्यावरण विभागाचा शासन निर्णय क्रमांक रासयो-२०१७/प्र.क्र.३६/तां.क.३ दिनांक २१.११.२०१७

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,रत्नागिरी यांचे पत्र क्र.रजिप/ग्रापापु/तांशा-३/ - दि.०३.१०.२०१७

३) सूकाणू समितीच्या दि.१७.०३.२०२२ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना -**

राज्य सरोवर संवर्धन योनजेतर्गत जिल्हा परिषदेमार्फत सादर तलावाच्या संवर्धन प्रस्तावास संदर्भाधीन दिनांक २१ नोव्हेंबर २०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. उपरोक्त तलावाच्या संवर्धनाच्या अनुषंगाने मंजूर करण्यात आलेली कामे राबविण्यासाठी संदर्भाधीन दिनांक २१ नोव्हेंबर २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये रुपये ४०.०० लक्ष इतका निधी वितरित करण्यात आला होता. सदर रकमेचा पुर्णपणे विनियोग झाल्याबाबत संबंधितांनी उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे. उपरोक्त कागदपत्राच्या आधारे तसेच एकूण खर्चाच्या अनुषंगाने ग्रुप ग्रामपंचायत विरसई, ता. दापोली, जि.रत्नागिरी येथील गोठण तलावाच्या पर्यावरण संवर्धनासाठी उर्वरित रूपये ३७,७३,३९०/- इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राज्य सरोवर संवर्धन योजनेतंर्गत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांचेमार्फत प्राप्त गोठण तलावाच्या पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन करण्यासाठी संदर्भाधीन दिनांक २१ नोव्हेंबर २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये एकूण मंजूर रु. ८६,३७,१००/- (अक्षरी रुपये शहाऐंशी लक्ष सदतीस हजार शंभर फक्त) एवढया निधीमधील राज्य हिस्स्यापोटी एकूण मंजूर रु. ७७,७३,३९०/- (रु सत्त्याहतर लक्ष त्र्याहत्तर हजार तीनशे नव्वद फक्त) इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. मंजूर रकमेपैकी आतापर्यंत रुपये ४०,००,०००/-(रुपये चाळीस लक्ष फक्त) इतका निधी वितरित करण्यात आला असून आता या शासन निर्णयान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांना ग्रुप ग्रामपंचायत विरसई ता. दापोली, जि. रत्नागिरी येथील गोठण तलावाच्या संवर्धनासाठी उर्वरित कामे राबविण्यासाठी पुढील हप्ता रक्कम रूपये ३७,७३,३९०/- (रु. सदतीस लक्ष त्र्याहत्तर हजार तीनशे नव्वद फक्त ) इतका निधी वितरित करण्यास तसेच सदर रक्कम खर्च करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांना या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी सदर निधी मंजूर कामांसाठी खर्ची करून प्रकल्प पूर्णत्वाचा अहवाल विभागास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांना अदा करावयाची रूपये ३७,७३,३९०/- (रु. सदतीस लक्ष त्र्याहत्तर हजार तीनशे नव्वद फक्त ) एवढी रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत

कोषागारातून वित्त विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२०/प्र.क्र.६/२०/कोषा-प्रशा ५, दि १२.११.२०२१ अन्वये ई-कुबेर प्रणालीद्वारे थेट मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांच्या बँक खात्यात जमा करावे.

४. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र. यू-४, ३४३५ परिस्थितिकी व पर्यावरण ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -राज्य योजनांतर्गत योजना, (०२),पर्यावरण प्रतिबंध, (०२) (०७), राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या मुख्य- लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा.

५. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२१/प्रक्र.४८/अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर २०२१ व दिनांक ३ फेब्रूवारी २०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, दिनांक २४.०६.२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील परिशिष्टातील अनु.क्र. २ व ९ मधील अटींची पुर्तता होत आहे, तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्रक्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार वितरित करण्यात येत आहे.

I) वित्त विभागाच्या निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्रक्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील ३१ वेतनेतर सहायक अनुदाने या बाबीखालील खर्च करण्यात विभागाला अधिकारी प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील नमूद अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

II) वित्त विभागाच्या निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्रक्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक १,३,५,६,७ व ८ या प्रकरणी लागू नाही. तसेच सदर परिशिष्टातील अनुक्रमांक ४ बाबत नमूद करण्यात येते की ही योजना केंद्र पुरस्कृत बाहय सहाय्यित योजना नाही.

III) वित्त विभागाच्या निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्रक्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ च्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक २ च्या अनुषंगाने नमूद करण्यात येत की, सदर योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये कसलाही बदल करण्यात आलेला नाही. तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक १,२,३ व ४ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटींची पूर्तता होत आहे. तसेच सदर अनुक्रमांक ९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक ५ ते १० या प्रकरणी लागू नाही.

६. या शिवाय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा ५ दिनांक १०.०५.२०१६ अन्वये परिच्छेद क्र.४ मधील खालील बाबींची पूर्तता होत आहे.

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकाराबाबत वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र अर्थसं २०१८/ प्र.क्र.६९/अर्थ-३ दिनांक २.४.२०१८ मधील परिच्छेद क्र.६ (अ) नुसार रु.५ कोटी पर्यंतच्या अनावर्ती योजनेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना आहेत.

२) गोठण तलावाच्या संवर्धनासाठी रु. ८६,३७,१००/- (अक्षरी रुपये शहाऐंशी लक्ष सदतीस हजार शंभर फक्त) एवढया मंजूर निधीमधील राज्य हिस्स्यापोटी एकूण मंजूर रु. ७७,७३,३९०/- (रु सत्त्याहतर लक्ष त्र्याहत्तर

तीनशे नव्वद फक्त) पैकी रूपये ३७,७३,३९०/- (रु. सदतीस लक्ष त्र्याहत्तर हजार तीनशे नव्वद फक्त) इतका निधी पुढील हप्त्यापोटी प्रस्तुत शासन निर्णयाव्दारे वितरित करण्यात येत आहे.

३) सदर तलावास मागील तीन महिन्यात कोणताही निधी मंजूर करण्यात आलेला नाही. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांना वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाचा १०० टक्के विनियोग पूर्ण केला असल्याबाबत उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे.

४) "मागणी क्र.यु-४, ३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण, ०४, प्रदुषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०२) पर्यावरण प्रतिबंध (०२) (०७) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)"या मुख्य लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांच्याकडून पर्यावरण व वातावरणीय बदल विभागास कोणतेही येणे बाकी नाही.

६) तसेच उपरोक्त शासन निर्णयाच्या "अ" मधील परिच्छेदातील ६,७,८,९ या बाबी लागू नाहीत.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संमतीने,वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. १५७/२०२२/व्यय-१६, दि.३१.०३.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३११९०६२१३५०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, pseudonym=3A940ABDD514E7010BAFCF0BA3A5F07FC5DD06F1, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2022.03.31 19:10:08 +05'30'

**(सु. कि. निकम),**
सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग
महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी.
३. आयुक्त तथा संचालक नगरपरिषद संचालनालय, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
६. खाजगी सचिव, मा.मंत्री, पर्यावरण व वातावरणीय बदल, मंत्रालय,मुंबई
७. खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री, पर्यावरण व वातावरणीय बदल,मंत्रालय,मुंबई.
८. स्वीय सहायक ,प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मंबई
९. स्वीय सहायक, प्रधानसचिव, नगरविकास विभाग, मंत्रालय, मंबई.
१०. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई
११. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
१२. रोखशाखा, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती.